अर्थसंकल्पीय अनुदान वर्ष २०१८-१९.
नगरपालिका व नगरपरिषदांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान.
लेखाशिर्ष वाय-२, २२१५, ( २२१५ १६४७ ) ( वेतनेतर ) नगर परिषद, नांदुरा, जि.बुलडाणा, देवळी, जि.वर्धा, इंदापूर, जि.पुणे

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१८/प्र.क्र.५४/पापु-२१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २६ ऑक्टोबर, २०१८

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८

२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: सुनिअ २०१४/प्र.क्र.३१२/पापु-२२,दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८

३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: सुनिअ २०१३/प्र.क्र.४९४/पापु-२२,दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८

४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२,दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना -**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता विधीमंडळाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या तरतूदीच्या अनुषंगाने नागरी भागातील पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखालील नागरी नळ पाणी पुरवठा योजनेतील नगरपालिका/ नगरपरिषदांच्या (स्थानिक संस्था ) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान ( २२१५ १६४७), या कार्यक्रमाकरीता, सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात रु. १०,००,००,०००/- ( रुपये दहा कोटी फक्त ) इतके अर्थसंकल्पीय अनुदान मंजूर करण्यात आले असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर रु. ७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढे अनुदान उपरोक्त नमूद क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये वित्त विभागाकडून वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आले आहेत.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर असलेल्या उपरोक्त नमूद अर्थसंकल्पीय अनुदानापैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या रु. ७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढया अनुदानातून रु. ५,८७,८१,७१०/-( रुपये पाच कोटी, सत्त्याऐशी लाख,

एक्याऐशी हजार, सातशे दहा फक्त) एवढे अनुदान मुक्त व वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान योजनांचे कार्यान्वयन पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांचेकडून करण्यात येते.

२. सदर नागरी पाणी पुरवठा योजनांच्या कार्यान्वयनाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता १९२, नगरपरिषदांना सहाय्य (०२) नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता - (०२) (०२) नगरपालिकांच्या/नगरपरिषदांच्या पाणीपुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), २२१५ १६४७ या कार्यक्रमाखाली मंजूर असलेल्या रुपये १०,००,००,०००/- ( रुपये दहा कोटी फक्त ) इतक्या अर्थसंकल्पीय अनुदानापैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या रु.७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढया अनुदानातून रु.५,८७,८१,७१०/- ( रुपये पाच कोटी, सत्त्याऐशी लाख, एक्याऐशी हजार, सातशे दहा फक्त ) एवढे अनुदान संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई यांना या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून सशर्त मुक्त व वितरीत करण्यात येत आहे. या वितरीत व मुक्त तरतुदीचे वाटप खालील विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आले आहे.

विवरणपत्र

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | योजनेचे नांव | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|
| १ | नांदुरा नगर परिषद, जि.बुलढाणा | रु.२,०८,४६,४४०/- |
| २ | देवळी नगर परिषद, जि.वर्धा | रु.१,५०,००,०००/- |
| ३ | इंदापूर नगर परिषद, जि.पुणे | रु.२,२९,३५,२७०/- |
| एकूण - ३ नगरपरिषद | | रु.५,८७,८१,७१०/- |

- सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत. शासनाच्या निदेशानुसार सदर अनुदान नागरी संस्थांना वितरीत करण्यात यावे.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत खर्च करावी.
- या मुक्त अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने शासनाला कळवावी.
- सदर अनुदानातून पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने सदर योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर यांना किंवा खास

अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे, महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास पाणी व स्वच्छता सहाय संस्थेने त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.

- मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता, पाणी व स्वच्छता सहाय संस्थेने महालेखापालांना सादर करावेत.
- पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने द्यावयाची आहेत. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी करावी , अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.
- सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.
- सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे सादर करावा.
- या शासन निर्णयान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. हा निधी उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.आर.के.साकोरे, संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. प्र.गि.कानडे, अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेली रक्कम उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांचे कार्यालयातून आहरित करुन सदर रक्कम ही एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी

३. या वितरीत केलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता १९२, नगरपरिषदांना सहाय्य (०२) नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता - (०२) (०२) नगरपालिकांच्या/नगरपरिषदांच्या पाणीपुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), २२१५ १६४७ या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागवावा.

४ प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद ६ ते ८ मधील अटी तसेच परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील प्रत्येक अटींची पूर्तता झालेली आहे.

५. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.५, परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०२६१६५०४५०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ashwini Ajit Churi

Digitally signed by Ashwini Ajit Churi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc415c49b1766fe713944cd353478be5a62d2ab3248ddf6d614e4b2336df6d3a, serialNumber=2eb76e0eb5944f78934cc7d4e7718beb1087d1306806e5e0d94bc1f43183f16e, cn=Ashwini Ajit Churi
Date: 2018.10.29 15:33:46 +05'30'

(अ.अ.चुरी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी .जी .ओ . इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०० ०२०.
४) महालेखापाल, महाराष्ट्र -२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४० ००१.
५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (५ प्रतींसह)
६) मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) नियंत्रक अधिकारी तथा अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
९) आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४ ( ५ प्रतीसह )
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा, वर्धा व पुणे.
११) मुख्याधिकारी, नांदुरा नगर परिषद, जिल्हा बुलढाणा.
१२) मुख्याधिकारी, देवळी नगर परिषद, जिल्हा वर्धा.
१३) मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद, जिल्हा पुणे.
१४) उप कोषागार अधिकारी, कोकणभवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४ .

१५) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय- ३, बीयुडी- १८, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१७) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०५, पापु-२०, पापु-२२ मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

१८) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२.

१९) निवडनस्ती ( पापु-२१ )